**प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत मोठ्या वसाहतींचे प्रकल्प निर्मितीसाठी "महाराष्ट्र गृहनिर्माण विकास महामंडळ " स्थापन करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण व शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्या. यांच्याकडून गुंतवणुकीबाबत. ..........**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र. महाहौसिंग/२०१७/प्र.क्र.१६१/गृनिधो-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २८-०९-२०२१.

**वाचा:-**

१) शासन निर्णय:- क्र. महाहौसिंग/२०१७/प्र.क्र.१६१/गृनिधो-२, दिनांक ११ डिसेंबर, २०१८.
२) शासन पत्र क्र. महाहौसिंग/२०१७/प्र.क्र.१६१/गृनिधो-२,दिनांक २० फ़ेब्रुवारी, २०१९.

**प्रस्तावना:-**

प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत घरकुलांच्या बांधकामास गती देण्यासाठी तसेच, निश्चित केलेली उद्दिष्ट विहित कालावधीमध्ये पुर्ण करण्याच्या हेतूने संदर्भिय क्र. १ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र गृहनिर्माण विकास महामंडळाची स्थापना करण्यात आली आहे. सदर मंडळाच्या स्थापनेसाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित व अन्य इच्छूक शासकीय संस्था / यंत्रणा यांनी प्रत्येकी रुपये१०० कोटी इतकया निधीच्या समभाग गुंतवणूकीतून निर्माण होणारी संस्था असेल सदर शासन निर्णयात नमूद केलेले आहे.

मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक२७/०२/२०१९ च्या बैठकीत महाराष्ट्र गृहनिर्माण विकास महामंडळाची स्थापना करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित या संस्थांनी प्रत्येकी रु. १०० कोटी च्या ऐवजी रुपये २०० कोटी इतका निधी देण्याचा निर्णय घेण्यात आला. सदर निर्णयाच्या अनुषंगाने आवश्यक सुचना संदर्भिय क्र. २ येथील शासन पत्रान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. तथापि, याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला नव्हता . सदरहू शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक २७.०२.२०१९ च्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार महाराष्ट्र गृहनिर्माण विकास महामंडळाची स्थापना करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, झोपडपट्टी पुनर्वसन

प्राधिकरण, शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित या संस्थांकडून प्रत्येकी रुपये २०० कोटी इतका निधी दोन टप्प्यात देण्यात यावा.

२. सदरचा शासन निर्णय मंत्रीमंडळाने दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९२८१७०१२५४९०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by RAJU GULABRAO AMBADEKAR
Date: 2021.09.28 17:04:26 +05'30'

**( राजु अंबाडेकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१.मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३.मा. मंत्री ( गृहनिर्माण ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
४.मा. राज्यमंत्री ( गृहनिर्माण ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५.मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, म. वि. स., विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, म. वि. स., विधानभवन, मुंबई
७.मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८.उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे ( पू ), मुंबई-५१.
९.व्यवस्थापकीय संचालक, शिवशाही पुनर्वसन प्रकल्प, गृहनिर्माण भवन, वांद्रे ( पू ), मुंबई-५१.
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे ( पू ), मुंबई-५१.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, धारावी पुनर्वसन प्रकल्प, गृहनिर्माण भवन, वांद्रे ( पू ), मुंबई-५१.
१२.संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
१३.निवडनस्ती (गृनिधो-२).